**प्रशासकीय मान्यता :-**
सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात राज्य योजनांतर्गत उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयांसाठी स्कील लॅब उपलब्ध करुन देण्यासाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : यंत्रख-२०२२/प्र.क्र.१९२ /प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२३

**वाचा :**
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक : ०१/१२/२०१६
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक : २६/०७/२०१७
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक : २४/०८/२०१७
४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०२१/प्र.क्र.८/उद्योग-४, दिनांक : ०७/०५/२०२१
५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. डीएमईआर-२२०११/३७/२०२२-पीआरओसी१, दिनांक : १५/०२/२०२३

**शासन निर्णय :**

विभागाच्या नियंत्रणाखालील ०८ शासकीय वैद्यकीय महाविद्यालयांमध्ये स्कील लॅब उपलब्ध करुन देण्याकरीता प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव संचालनालयाने शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात राज्य योजनातंर्गत संबंधित लेखाशीर्षात प्राप्त होणा-या अनुदानाच्या अधीन राहून अंदाजे रुपये ६३,२०,००,०००/- (अक्षरी रूपये त्रेसष्ठ कोटी वीस लक्ष फक्त) इतक्या किंमतीची खालील तक्त्यात नमूद संस्थाना स्कील लॅब खरेदी करण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नाव | संस्थेचे नाव | नग संख्या | प्रति नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|---|
| १ | स्कील लॅब | राजर्षी शाहू महाराज शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, कोल्हापूर | १ | ७,९०,००,००० | ७,९०,००,००० |

| अ. क्र. | यंत्राचे नाव | संस्थेचे नाव | नग संख्या | प्रति नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|---|
| २ | | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर | १ | ७,९०,००,००० | ७,९०,००,००० |
| ३ | | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, औरंगाबाद | १ | ७,९०,००,००० | ७,९०,००,००० |
| ४ | | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, चंद्रपूर | १ | ७,९०,००,००० | ७,९०,००,००० |
| ५ | | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जळगांव | १ | ७,९०,००,००० | ७,९०,००,००० |
| ६ | | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती | १ | ७,९०,००,००० | ७,९०,००,००० |
| ७ | | श्री. वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, यवतमाळ | १ | ७,९०,००,००० | ७,९०,००,००० |
| ८ | | विलासराव देशमुख शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, लातूर | १ | ७,९०,००,००० | ७,९०,००,००० |
| **एकूण** | | | ८ | | **६३,२०,००,०००** |

**अटी :-**

१) सदर प्रशासकीय मान्यता सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात राज्य योजनेंतर्गत उपलब्ध अनुदानातून संबंधित संस्थेस निधी उपलब्धतेच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

२) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३) सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ च्या खरेदी धोरणातील तरतूदीनुसार अथवा शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक: संकिर्ण-२०१४/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७ अन्वये विहित करण्यात आलेल्या गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवरुन ज्यांचे दर कमी असतील त्याप्रमाणे विहित कार्यपद्धती राबवून करण्यात यावी.

४) सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

५) सदर यंत्रसामुग्रीसाठी कोणत्याही नवीन बांधकामाची तसेच नवीन पदनिर्मीतीची आवश्यकता नसल्याची खातरजमा करण्यात यावी.

६) सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी प्रमाणित करावे.

७) प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी खात्री करावी.

८) मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९) सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक: ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे अनुपालन करावे.

**२.** शासकीय वैद्यकीय संस्थांकरीता प्रस्तावित यंत्रसामुग्री खरेदीसाठी येणारा खर्च खालील तपशीलात नमूद संबंधित लेखाशीर्षातंर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक : एस-०४

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषमचिकित्सा |
| (००) (३७) | - | शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये यांचे बळकटीकरण व दर्जा वाढ करणे (कार्यक्रम) |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (४२१० १६२९) |

**३.** सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२१५१७३८५५६११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2023.02.27 18:04:01 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (वैद्यकीय शिक्षण ), वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई

२) महालेखाकार-१/२ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र,मुंबई/नागपूर

३) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई

४) सर्व सह संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई

५) संबंधित अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, (संचालनालयामार्फत)

६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत)

७) निवडनस्ती (प्रशा-१)